सार्वत्रिक बदल्या सन २०११
विशेषज्ञ, गट-अ

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग,
शासन आदेश क्र. राकायो-२६११/६६९/प्र.क्र.१२८अ(१)/राकावि-१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३ जून, २०११

**आदेश :-** राज्य कामगार विमा योजनेअंतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय विमा सेवा, गट-अ (वेतनबँड रु.१५६००-३९१०० + ग्रेड वेतन रु.६६००/-) मधील विशेषज्ञ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेत खालीलप्रमाणे बदल करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | विशेषज्ञाचे नाव | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | डॉ. (श्रीमती) भारती राठोड, (स्त्रीरोग व प्रसूती तज्ञ) | रा.का.वि.यो. रुग्णालय, वाशी, नवी मुंबई | रा.का.वि.यो. रुग्णालय, वरळी, मुंबई येथील रिक्त पदावर **(विनंती बदली)** |

२. उपरोक्त बदली विनंतीनुसार करण्यात आली असल्याने संबंधित अधिकाऱ्यास कोणत्याही प्रकारचा प्रवासभत्ता व पदग्रहण अवधी अनुज्ञेय होणार नाही.

३. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या सुधारित पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संबंधित वैद्यकीय अधिक्षक यांनी आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांना तसेच शासनास सादर करावा.

४. बदली झालेल्या अधिकाऱ्यांची कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्यावर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

५. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत त्यांनी नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे. जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती "अनधिकृत अनुपस्थिती" म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येत नाही याची जाणीव सर्व संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

६. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांनी जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत, त्यांचेविरुध्द वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी, जेणेकरुन अधिकारी वेळीच नवीन पदस्थापनेवर हजर होतील.

७. वरील बाबी विचारात घेऊन या प्रकरणी अनुपालन अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

८. हे आदेश महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील नियम ४(४)(दोन) व ४(५) नुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(सं. गि. पाटील)**
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

प्रति,
आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई
संचालक (प्रशासन/वैद्यकीय), राज्य कामगार विमा योजना, मुंबई

वैद्यकीय अधिक्षक, राज्य कामगार विमा योजना रुग्णालय, वाशी, नवी मुंबई / वरळी, मुंबई
महालेखापाल-१, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
उप कोषागार अधिकारी, कोकण भवन
संबंधित वैद्यकीय अधिकारी (आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचेमार्फत)
निवड नस्ती, राकावि-१.

सार्वत्रिक बदल्या सन २०११
विशेषज्ञ, गट-अ

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग,
शासन आदेश क्र. राकायो-२६११/६६९/प्र.क्र.१२८अ(२)/राकावि-१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३ जून, २०११

**आदेश :-** राज्य कामगार विमा योजनेअंतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय विमा सेवा, गट-अ (वेतनबँड रु.१५६००-३९१०० + ग्रेड वेतन रु.६६००/-) मधील विशेषज्ञ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेत खालीलप्रमाणे बदल करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | विशेषज्ञाचे नाव | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | डॉ. आर. जे. कुंभारे, (शल्यचिकित्सक) | रा.का.वि.यो. रुग्णालय, सोलापूर | रा.का.वि.यो. रुग्णालय, औंध (मोहननगर), पुणे येथील रिक्त पदावर **(विनंती बदली)** |

२. उपरोक्त बदली विनंतीनुसार करण्यात आली असल्याने संबंधित अधिकाऱ्यास कोणत्याही प्रकारचा प्रवासभत्ता व पदग्रहण अवधी अनुज्ञेय होणार नाही.

३. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या सुधारित पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संबंधित वैद्यकीय अधिक्षक यांनी आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांना तसेच शासनास सादर करावा.

४. बदली झालेल्या अधिकाऱ्यांची कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्यावर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

५. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत त्यांनी नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे. जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती "अनधिकृत अनुपस्थिती" म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येत नाही याची जाणीव सर्व संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

६. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांनी जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत, त्यांचेविरुध्द वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी, जेणेकरुन अधिकारी वेळीच नवीन पदस्थापनेवर हजर होतील.

७. वरील बाबी विचारात घेऊन या प्रकरणी अनुपालन अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

८. हे आदेश महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील नियम ४(४)(दोन) व ४(५) नुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(सं. गि. पाटील)**
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

प्रति,
आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई
संचालक (प्रशासन/वैद्यकीय), राज्य कामगार विमा योजना, मुंबई
वैद्यकीय अधिक्षक, राज्य कामगार विमा योजना रुग्णालय, सोलापूर / औंध, पुणे

महालेखापाल-१, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर / पुणे
संबंधित वैद्यकीय अधिकारी (आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचेमार्फत)
निवड नस्ती, राकावि-१.